**महाराष्ट्र राज्यातील अनुसूचित जमातीच्या उमेदवारांसाठी संघ लोकसेवा आयोगाच्या नागरी सेवा मुख्य परीक्षा व मुलाखत तयारी करिता प्रोत्साहन म्हणून आर्थिक मदत देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण २०२०/प्र.क्र. ७५/ का. ९**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १३ नोव्हेंबर, २०२०.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यातील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांचे संघ लोकसेवा आयोग (यु.पी.एस.सी.) पुरुस्कृत परीक्षांमध्ये उत्तीर्ण होण्याचे प्रमाण इतर समाज घटकांच्या तुलनेत अत्यंत कमी आहे. आदिवासी विद्यार्थी हे अति दुर्गम भागात राहतात. त्यांची आर्थिक परिस्थिती बिकट असते. तशाही परिस्थितीत ते शिक्षण घेऊन शिक्षित होतात. परंतु योग्य प्रशिक्षणाअभावी भारतीय प्रशासकीय सेवेसाठी घेण्यात येणाऱ्या परीक्षांमध्ये ते पात्र ठरू शकत नाहीत. त्यामुळे आखिल भारतीय नागरी सेवा तसेच राज्य सेवेत अनुसूचित जमातीच्या अधिकाऱ्यांचे प्रमाण फारच कमी आहे. तसेच, संघ लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येणाऱ्या परीक्षांसाठी आदिवासी विद्यार्थ्यांना परीक्षा पूर्व प्रशिक्षण देण्याकरिता प्रशिक्षणाची व्यवस्था करावी अशा प्रकारची मागणी राज्यातील विविध आदिवासी लोकप्रतिनिधी / संघटना कडून करण्यात येत आहे. या अनुषंगाने बार्टी, पुणे या संस्थेच्या धर्तीवर संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा पूर्व परिक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांसाठी व मुख्य परिक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर मुलाखतीच्या तयारीकरिता प्रोत्साहनपर आर्थिक सहाय्य देणेची योजना तयार करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

राज्यातील अनुसूचित जमातीचे उमेदवारांचे संघ लोकसेवा आयोग (यु.पी.एस.सी.) मार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या स्पर्धा परीक्षांमध्ये भाग घेण्याचे प्रमाण अल्प आहे. पर्यायाने उत्तीर्ण होण्याऱ्या उमेदवारांमध्ये अनुसूचित जमातीचे उमेदवारांचे प्रमाण देखील अल्प आहे. त्यामुळे त्यांना विकासाच्या मुख्य प्रवाहात आणण्याकरिता संघ लोकसेवा आयोग (यु.पी.एस.सी.) यांच्यामार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या नागरी सेवा स्पर्धा परीक्षा उत्तीर्ण होऊन प्रशासकीय अधिकारी होण्याची संधी मिळावी म्हणून या उमेदवारांना सदर आयोगाच्या नागरी सेवा मुख्य परीक्षा व मुलाखत तयारीकरिता सन २०२०-२१ या वर्षापासून सोबतच्या "प्रपत्र-अ" व "प्रपत्र-ब" मध्ये दर्शविल्याप्रमाणे प्रोत्साहनपर आर्थिक सहाय्य देण्यास या शासन निर्णयाअन्वये मान्यता देण्यात येत आहे .

२. सदर योजनेच्या अंमलबजावणीकरिता आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी "तसेच "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्यामार्फत सदर योजनेअंतर्गत उमेदवारांची निवड प्रक्रिया पार पाडण्यास व पात्र उमेदवाराना निधीचे वितरण थेट उमेदवाऱ्यांच्या खात्यात करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**३.** सदर योजनेचा खर्च सोबतच्या "प्रपत्र-अ" व "प्रपत्र-ब" मध्ये दर्शविल्याप्रमाणे आहे. याव्यतिरिक्त आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना योजनेच्या खर्चाच्या १३ टक्के रक्कम प्रशासकिय व इतर

खर्चाकरिता देण्यात येत आहे. सबब, योजनेकरिता वार्षिक एकूण रु. २८,२५,००० (अक्षरी रुपये अठ्ठावीस लक्ष पंचवीस हजार फक्त) खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

**४. उमेदवारांची सर्वसाधारण पात्रता:**

१. उमेदवाराने संघ लोकसेवा आयोग नागरी सेवा पूर्व परीक्षेचे प्रवेश पत्र (HallTicket) देणे आवश्यक.

२. उमेदवारांची उपरोक्त परीक्षेची अर्हता, शिक्षण, वय व इतर पात्रता व अटी पूर्ण केलेल्या असाव्यात.

३. प्रशिक्षाणार्थीने चालू वर्षामध्ये संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा परीक्षेची पूर्व परीक्षा उत्तीर्ण झाली असली पाहिजे. व त्याचा UPSC Detail Application Form (DAF) फॉर्म ची छायांकित प्रत आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्थेमध्ये जमा करणे आवश्यक.

४. उमेदवार महाराष्ट्र राज्यातील रहिवासी /अधिवासी असला पाहिजे.

५. उमेदवाराची जमात ही महाराष्ट्र राज्यातील अनुसूचित जमातीच्या यादी मधील असणे आवश्यक.

६. प्रशिक्षणासाठी प्रवेश घेते वेळेस उमेदवाराकडे अनुसूचित जमातीचे वैधता प्रमाणपत्र असणे बंधनकारक आहे.

७. शासकीय सेवेत असणाऱ्या उमेदवारास ह्या योजनेचा लाभ घेता येणार नाही.

८. विद्यार्थ्याने खोटे कागदपत्रे सादर करून योजनेचा लाभ घेतला असल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचेकडून संपूर्ण प्रशिक्षणाचा खर्च वसूल करून कायदेशीर दंडात्मक कारवाई करण्यात येईल.

**५. योजनेचे नाव , प्रवेश परीक्षा व उमेदवारांची निवड :**

**अ ) सन २०२०-२१ या चालू वर्षापासून संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा परीक्षेची पूर्व परीक्षा उत्तीर्ण झाले आहेत अशा उमेदवारांसाठी संघ लोकसेवा आयोग नागरी सेवा स्पर्धा परीक्षा मुख्य परीक्षा तयारी करीता आर्थिक सहाय्य योजना:**

जे उमेदवार चालू वर्षामध्ये संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा परीक्षेची पूर्व परीक्षा उत्तीर्ण झाले आहेत अशा उमेदवारांसाठी त्या वर्षीच्या संघ लोकसेवा आयोग नागरी सेवा मुख्य परीक्षेची तयारी करण्याकरिता आर्थिक सहाय्य देण्यात येईल. प्रशिक्षणार्थ्यांना ह्या योजनेचा लाभ फक्त तीन वेळा घेता येईल.

संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा परीक्षेची पूर्व परीक्षेचा निकाल जाहीर झाल्यानंतर आदिवासी संशोधन व प्रशिक्षण या संस्थेमार्फत सर्वदूर पोहोचणाऱ्या तसेच सर्वाधिक खपाच्या महत्वाच्या दैनिकांमध्ये जाहिरात देण्यात येईल. प्राप्त अर्जांची संख्या २५ पेक्षा जास्त असेल तर त्या उमेदवारास दहावी, बारावी, पदवी, या परीक्षेमध्ये प्राप्त गुणांची सरासरी काढून गुणानुक्रमे निवड यादी आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था स्तरावरून प्रकाशित केली जाईल. या योजनेसाठी एकूण २५ उमेदवारांची निवड केली जाईल. सदर योजनेचा लाभ जास्तीत जास्त तीन वेळा एका उमेदवारास घेता येईल.

या योजनेअंतर्गत तीन महिन्यांकरिता उमेदवारांस प्रति माह १२,०००/- इतके विद्यावेतन देण्यात येईल. तसेच पुस्तक खरेदीकरिता एकवेळ रु. १४,०००/- इतका निधी देण्यात येईल.

**ब) सन २०२०-२१ या चालू वर्षापासून संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा परीक्षेची मुख्य परीक्षा उत्तीर्ण झाले आहेत त्या उमेदवारांसाठी संघ लोकसेवा आयोग नागरी सेवा स्पर्धा परीक्षा मुलाखत तयारी करीता आर्थिक प्रोत्साहन योजना :**

अनुसूचित जमातीचे जे उमेदवार संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा परीक्षेची मुख्य परीक्षा उत्तीर्ण झाले आहेत त्या उमेदवारांना मुलाखत तयारी करीता म्हणून आर्थिक प्रोत्साहन देण्यात येईल. याकरिता संघ लोकसेवा आयोगाच्या नागरी सेवा मुख्य परीक्षेचा निकाल जाहीर झाल्यानंतर आदिवासी संशोधन व प्रशिक्षण या संस्थेमार्फत सर्वदूर पोहोचणाऱ्या तसेच सर्वाधिक खपाच्या महत्वाच्या दैनिकांमध्ये जाहिरात देण्यात येईल. प्राप्त अर्जांची संख्या २५ पेक्षा जास्त असेल तर त्या उमेदवारास दहावी, बारावी, पदवी, या परीक्षेमध्ये प्राप्त गुणांची सरासरी काढून गुणानुक्रमे निवड यादी आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था स्तरावरून प्रकाशित केली जाईल. या योजनेसाठीदेखील एकूण २५ उमेदवारांची निवड केली जाईल.

या योजनेअंतर्गत दोन महिन्यांकरिता उमेदवारांस प्रति माह १२,०००/- इतके विद्यावेतन देण्यात येईल. सदर योजनेचा लाभ घेण्याबाबत उमेदवारांना संधीबाबत (Attempt) बंधन नाही. पात्र प्रशिक्षणार्थी या योजनेचा कितीही वेळा लाभ घेऊ शकतो.

६. या योजनेकरिता होणारा खर्च मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशिर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ०२, अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (३६) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना भारतीय व राज्य प्रशासकिय सेवेची संधी प्राप्त करुन देण्यासाठी त्यांना संघ लोकसेवा आयोग / महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेण्यात येणाऱ्या स्पर्धा परिक्षांचे प्रशिक्षण देणे (२२२५ डी ३८७)३१, सहायक अनुदाने ( वेतनेतर ) या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११३१८२२२७८१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, serialNumber=e5bb5862d0e131a274d92f7a1acef953e01301c1b0fb615dc6cce4812bded257, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2020.11.13 18:24:43 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री ( आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
५. सर्व संसद सदस्य.
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा.
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद.
८. सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.

११. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.

१२. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक

१४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.

१५. अपर आयुक्त, आदिवासी विकास ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती

१६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

१७. सर्व सह सचिव / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८. निवडनस्ती, कार्यासन-९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**"प्रपत्र-अ"**

**अ) सन २०२०-२१ या चालू वर्षापासून संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा पूर्व परिक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांसाठी मुख्य परिक्षा तयारीकरिता आर्थिक सहाय्य योजना खर्चाचे अंदाजपत्रक-**

| अ.क्र. | खर्चाची बाब | २५ प्रशिक्षणार्थी खर्च ( रु.) |
|---|---|---|
| १ | उमेदवारांस निर्वाह भत्ता ( १२,००० X २५ X ३ ) (विद्यावेतन X विद्यार्थी संख्या X महिने ) | ९,००,०००/- |
| २ | पुस्तक खरेदी करिता एकवेळ निव्वळ रक्कम देणे ( १४,००० X २५ ) | ३,५०,०००/- |
| ३ | जाहिरात व इतर खर्च | ५,००,०००/- |
| | एकूण | १७,५०,०००/- |

**"प्रपत्र -ब"**

**ब) सन २०२०-२१ या चालू वर्षापासून संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा मुख्य परिक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांसाठी मुलाखत तयारीकरिता आर्थिक प्रोत्साहन योजना खर्चाचे अंदाजपत्रक-**

| अ.क्र. | खर्चाची बाब | २५ प्रशिक्षणार्थी खर्च ( रु.) |
|---|---|---|
| १ | उमेदवारांस निर्वाह भत्ता ( १२,००० X २५ X २ ) (विद्यावेतन X विद्यार्थी संख्या X महिने ) | ६,००,०००/- |
| २ | जाहिरात व इतर खर्च | १,५०,०००/- |
| | एकूण | ७,५०,०००/- |